# महाराष्ट्र शासन

क्रमांक: बीयुडी.-१६२२/प्र.क्र.२२३/२८-अ
सामान्य प्रशासन विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २४ मार्च, २०२३.

**विषय :- मिहान प्रकल्पाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस अनुदान वितरीत करणेबाबत.**

वाचा:- १. शासन निर्णय क्र.मविवि-१२१९/प्र.क्र.२५/ २८-अ, दि.०७.०९.२०१९.
२. शासन ज्ञापन क्र.बीयुडी-१६२२/प्र.क्र.२२३/२८-अ, दि. २३.०८.२०२२.
३. शासन ज्ञापन क्र.बीयुडी-१६२२/प्र.क्र.२२३/२८-अ, दि. ०४.११.२०२२.
४. शासन ज्ञापन क्र.बीयुडी-१६२२/प्र.क्र.२२३/२८-अ, दि. १९.०१.२०२३.
५. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई यांचे पत्र क्र.मविविकं/२०२३ /वित्त व लेखा/ १३४७, दि.०३.०२.२०२३.
६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ- ३, दि. ०८.०२.२०२३.

**शासन ज्ञापन** :-

लेखाशीर्ष ३०५३ ०१७३ खाली ३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अंतर्गत मिहान प्रकल्पातील भूसंपादन, पुनर्वसन व १२.५% सानुग्रह अनुदान व भारतीय वायुदलाच्या मौजा जयताळा येथील पोच रस्ता बांधकामासाठी तसेच दिवाणी न्यायालयातील कलम १८ व २८ खालील दाव्यांसाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष ३०५३-०१७३ खाली रु.३२३.६१ कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत केला आहे.

२. आतापर्यंत लेखाशीर्ष ३०५३ ०१७३ खाली मिहान प्रकल्पासाठी अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत दि.२३.०८.२०२२ रोजीच्या शासन ज्ञापना अन्वये रु.६७,९५,८१,०००/-, दि.०४.११.२०२२ रोजीच्या शासन ज्ञापना अन्वये रु.४५,३०,५४,०००/- व दि.१९.०१.२०२३ रोजीच्या शासन ज्ञापना अन्वये रू.८०,९०,२५,०००/- असा एकूण रु.१९४,१६,६०,०००/- इतका निधी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

३. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष ३०५३ ०१७३ खाली सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत रु.३२,३६,१०,०००/- इतक्या निधी वितरणास नियोजन विभाग व वित्त विभागाने मान्यता दिली आहे. आता **एकूण रु. ३२,३६,१०,०००/- (अक्षरी रक्कम रुपये बत्तीस कोटी छत्तीस लाख दहा हजार फ़क्त)** इतका निधी वितरण करण्यात येत आहे. या अनुषंगाने रु.**३२,३६,१०,०००/- (अक्षरी रक्कम रुपये बत्तीस कोटी छत्तीस लाख दहा हजार फ़क्त)** निधी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस उपलब्ध करुन देण्यासाठी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरित करण्यात येत आहे.

**योजनेचे नाव - मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमान चालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (००) (०३) मिहान प्रकल्पाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (कार्यक्रम) (३०५३ ०१७३) ३५ भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान**

(रक्कम रुपयात)

| अ. क्र. | बाब | सन २०२२-२३ ची मूळ अर्थसंकल्पिय तरतूद | सन २०२२-२३ चे सुधारीत अंदाज | सन २०२२-२३ मध्ये वितरीत करण्यात आलेली रककम | आता वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १. | मिहान प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसन | ३२३,६१,००,००० | २२६,५२,७०,००० | १९४,१६,६०,०००. | १०,३६,१०,००० |
| | १२.५% सानुग्रह अनुदान | | | | |
| | भारतीय वायुदलाच्या मौजा जयताळा येथील पोच रस्ता बांधकामासाठी | | | | |
| ३. | दिवाणी न्यायालयातील वाढीव नुकसान भरपाई बाबतचे कलम १८ खालील दाखल दावे | | | | १६,००,००,००० |
| | दिवाणी न्यायालयातील कलम १८ नुसार वाढीव नुकसान भरपाई मिळण्याच्या अनुषंगाने कलम २८ करिता दाखल दावे | | | | ६,००,००,००० |
| | एकूण | ३२३,६१,००,००० | २२६,५२,७०,००० | रु१९४,१६,६०,०००. | ३२,३६,१०,०००/- |

(अक्षरी रक्कम रुपये बत्तीस कोटी छत्तीस लाख दहा हजार फ़क्त)

३. उपरोक्त खर्च "**मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमान चालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (००) (०३) मिहान प्रकल्पाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (कार्यक्रम) (३०५३ ०१७३) ३५ भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान**" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ करिता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. याबाबत उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

४. वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकासकामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो दि.३१ मार्च २०२३ पूर्वी खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. तसेच, वितरीत निधी PLA अथवा बँक खात्यात जमा न करता विहीत प्रयोजनातूनच खर्च होण्याची खातरजमा कंपनीने करावी व खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत वेळोवेळी आढावा घेऊन विहीत कालावधीत खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या दि.०४.०४.२०२२ च्या परिपत्रकातील नमूद अटींची पूर्तता करुन तसेच, वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ १५५/व्यय-४, दि.१४.०३.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक क्र. २०२३०३२४१७४०१७९००७ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SHILPA ABHAY CHACHAD

Digitally signed by SHILPA ABHAY CHACHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=3f0b1454eadcb46569c38e868a5b441a8a32b442036ce5c8ffbed5e862cc4202, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=15FE38A4E995535864D6D7BC4CB39F75BB8A6906B9DA526DCB4921B96EE9B6EF, cn=SHILPA ABHAY CHACHAD
Date: 2023.03.25 12:16:08 +05'30'

**( शिल्पा चाचड )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या., मुंबई
२. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
३. उपसंचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
४. महालेखापाल, ( लेखा परिक्षा)/ (लेखा अनुज्ञेयता ),महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, कार्या-१४४३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, कार्या-व्यय ४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, कार्या-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती.